अन्न व पोषण सुरक्षा (पूर्वीचे राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान) वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) योजनेकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी१४१, २४०१बी१५२)
राज्य हिस्सा(लेखाशिर्ष २४०१बी१२३, २४०१बी१३२)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १७ फेब्रुवारी, २०२३

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२
२) कृषि एवं किवास कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.F. No.२०-२७/२०१७-NFSM (CA-V), दि.२९.११.२०२२
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.राअसुअ-२०२२/प्र.क्र.९४/४-अे,

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस) या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१-पीक संवर्धन, १०८, वाणिज्यिक पिके, (००) (७८९)-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०७) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-कापूस केंद्र हिस्सा (२४०१B१४१) रु.३३.०० लाख, (०१) (०८) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-कापूस राज्य हिस्सा (२४०१B१५२) रु.२२.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे. तर केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिके (ऊस) या योजनेसाठी (०१) (०५) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-ऊस केंद्र हिस्सा (२४०१B१२३) रु.३३.०० लाख, (०१) (०६) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-ऊस राज्य हिस्सा (२४०१B१३२) रु.२२.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. त्यानुसार अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत कृषि व पदुम विभागाने वाचा क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन (अ) केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस) या योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी केंद्र हिस्सा (२४०१B१४१) या लेखाशिर्षाखाली रु.६.७१ लाख तसेच राज्य हिस्सा (२४०१B१५२) या लेखाशिर्षाखाली रु.४.४७३३३ लाख असा एकूण रु.११.१८३३३ लाख तर (ब) केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिके (ऊस) या योजनेसाठी केंद्र हिस्सा (२४०१B१२३) या लेखाशिर्षाखाली रु.४.१२ लाख व राज्य हिस्सा (२४०१B१३२) या लेखाशिर्षाखाली रु.२.७४ लाख असा एकूण रु.६.८६६६७ लाख (रु.११.१८३३३ लाख + रु.६.८६६६७ लाख = रु.१८.०५ लाख) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय

माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२०१२३१३६४८२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2023.02.20 12:35:51 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, कृषी व पदुमण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.